सिंधुदुर्ग खारभूमी विकास विभाग, सिंधुदुर्ग हे विभागीय कार्यालय बंद करुन राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ (SLTAC-II), पुणे च्या युनिटसाठी पदे उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१७/प्र. क्र.९४/२०१७/आ.(प्रशि)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :-०८ जून, २०१७.

**वाचा :**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ८/३/१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: सीओई/२०१३/(२३/२०१३)/ज.वि., दि.६/२/२००३.
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: संकीर्ण-२०१५/११९/२०१५/जसं(आस्था), दि.१६/१२/२०१५
५) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: WRD-Restructuring-2016/305/104/16/ WR(Estt), Dt.4/8/2016
६) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: आढावा-२०१६/प्र.क्र.२१८/२०१६/आ(प्रशि), दि.८/११/२०१६
७) शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१७/प्र. क्र.९४/२०१७/आ.(प्रशि), दि.८/५/२०१७
८) शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१७/प्र. क्र.९४/२०१७/आ.(प्रशि), दि. ३/६/२०१७

**प्रस्तावना -**

राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२, पुणे (SLTAC-II) च्या कामासाठी अ.क्र.७ येथील शासन निर्णयान्वये ७ अधिकारी / कर्मचाऱ्यांचे एक अतिरिक्त युनिट निर्माण करुन ते कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे या कार्यालयास संलग्न करण्यात आले आहे. तसेच, सदर युनिटसाठी ७ पदांचा आकृतीबंध निश्चित करुन ५ पदे उपलब्ध करुन देण्यात आली आहेत. त्यापैकी कार्यकारी अभियंताचे एक पद व उपअभियंता चे एक पद यथावकाश उपलब्ध करुन देण्याचे शासन निर्णयात नमूद करण्यात आले आहे. जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांचा कार्यप्रकारानुसार सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याच्या कार्यवाही दरम्यान सचिव स्तरावर संपूर्ण क्षेत्रिय कार्यालयांचा कामानुसार आढावा घेण्यात आला आहे. त्यानुसार ज्या विभाग व उपविभागांतर्गत पुरेसा कार्यभार शिल्लक नाही, अशी कार्यालये शासन स्तरावर बंद करण्यात येत आहे. या बंद करण्यात येत असलेल्या कार्यालयांपैकी

खारभूमी विकास मंडळ, ठाणे अधिनस्त सिंधुदुर्ग खारभूमी विकास विभाग, सिंधुदुर्ग हे विभागीय कार्यालय बंद करुन या कार्यालयाच्या मंजूर आस्थापनेवरील कार्यकारी अभियंता व उपअभियंता ही दोन पदे राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२, पुणे (SLTAC-II) या युनिटसाठी उपलब्ध करुन देण्याचे विचाराधीन होते. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

खारभूमी विकास मंडळ, ठाणे अधिनस्त सिंधुदुर्ग खारभूमी विकास विभाग, सिंधुदुर्ग हे विभागीय कार्यालय बंद करण्यात येत आहे.

२. सिंधुदुर्ग खारभूमी विकास विभाग, सिंधुदुर्ग हे विभागीय कार्यालय बंद झाल्याने विभागांतर्गत कार्यरत (१) खारभूमी सर्वेक्षण व अन्वेषण उपविभाग, तरळा, (२) खारभूमी विकास उपविभाग, कणकवली व (३) खारभूमी विकास उपविभाग, वेंगुर्ला ही ३ उपविभागीय कार्यालये मंजूर आस्थापना व कामांसह याच मंडळांतर्गतच्या दक्षिण रत्नागिरी खारभूमी विकास विभाग, रत्नागिरी अंतर्गत संलग्न करण्यात येत आहे.

बंद होणाऱ्या विभागीय कार्यालयांतर्गतचा शिल्लक कार्यभार व कार्यालयीन सर्व अभिलेख संबंधित मंडळ / विभागांतर्गत वर्ग करण्याची आवश्यक ती कार्यवाही मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी तात्काळ करावी.

३. बंद करण्यात आलेल्या विभागीय कार्यालयातील मंजूर पदांमधून कार्यकारी अभियंताचे एक पद व उपअभियंताचे एक पद राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ (SLTAC-II), पुणे या युनिटसाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. तसेच उर्वरित मंजूर पदांवरील कार्यरत अधिकारी/ कर्मचारी वर्गाचे समावेशन मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई या कार्यालयाधिनस्त रिक्त असलेल्या मंजूर पदांवर करण्यात यावे.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर-६११ /८३ / एडीएम-९, दिनांक ८ मार्च १९८४ मधील तरतूदीनुसार, (१) खारभूमी सर्वेक्षण व अन्वेषण उपविभाग, तरळा, (२) खारभूमी विकास उपविभाग, कणकवली व (३) खारभूमी विकास उपविभाग, वेंगुर्ला या तीन उपविभागीय कार्यालयांचे नियंत्रक अधिकारी म्हणून खारभूमी विकास मंडळ, ठाणे या मंडळ कार्यालयाच्या अधीक्षक

अभियंता यांना व दक्षिण रत्नागिरी खारभूमी विकास विभाग, रत्नागिरी या कार्यालयाचे कार्यकारी अभियंता यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून यान्वये घोषित करण्यात येत आहे.

५. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ (SLTAC-II), पुणे या युनिटसाठी उपलब्ध करण्यात आलेल्या पदांसाठी होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष - "४८०१-वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१ जलविद्युत निर्मिती ००१ संचालन व प्रशासन, (०१) संचालन व प्रशासन, (०१) (१२) अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे (४८०१ २४१२)" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. दक्षिण रत्नागिरी खारभूमी विकास विभाग, रत्नागिरी अंतर्गत संलग्न होणारी उपरोक्त नमूद उपविभागीय कार्यालये दिनांक १९ जून, २०१७ पासून कार्यान्वित होतील या दृष्टीने प्रदेश/ मंडळ कार्यालयाने तात्काळ आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी.

७. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.१०९२/ सीआर/ ८०६/ व्यय-६, दिनांक १५-१०-१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र.२०१७०६०८१३५००२१७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay K. Chaudhari

Digitally signed by Vijay K. Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, cn=Vijay K. Chaudhari
Date: 2017.06.08 13:51:38 +05'30'

**( वि. का. चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
४) मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक

६) मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व)
७) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
१२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक
१४) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
१६) अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे
१७) अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
१८) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई (कार्यालयांच्या स्थलांतरणाबाबत आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
१९) कार्यकारी अभियंता, राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ (SLTAC-II), पुणे
२०) कार्यकारी अभियंता, सिंधुदुर्ग खारभूमी विकास विभाग, सिंधुदुर्ग
२१) कार्यकारी अभियंता, दक्षिण रत्नागिरी खारभूमी विकास विभाग, रत्नागिरी
२२) उप अभियंता, खारभूमी सर्वेक्षण व अन्वेषण उपविभाग, तरळा
२३) उप अभियंता, खारभूमी विकास उपविभाग, कणकवली,
२४) उप अभियंता, खारभूमी विकास उपविभाग, वेंगुर्ला
२५) सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२६) कार्यासन आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.